**पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील “जलद प्रतिसाद पथक” यामधील पोलीस अधिकारी व कर्मचारी यांना प्रदान करावयाच्या विशेष सेवा पदक व प्रशस्तीपत्र यांची मर्यादा वाढविण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय क्र. पीएमडी-०१२३/प्र.क्र.२७/पोल-१.**

२रा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई. पिन-४०० ०३२.

दिनांक : २७ मार्च, २०२३.

<u>वाचा</u> :-
1) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.पीएमडी-१०१९/प्र.क्र.२४६/पोल-१, दिनांक १६.१.२०२०.
2) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांचे पत्र क्र. पोआ/क्युआरटी-प्रस्ताव/ १०/२०२२, दिनांक ०४.०१.२०२३.

<u>प्रस्तावना</u>-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील “जलद प्रतिसाद पथक” यामधील सलग दोन वर्ष सेवा *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* पूर्ण केलेले आठ पोलीस अधिकारी आणि सलग चार वर्ष सेवा *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* पूर्ण केलेले ४२ पोलीस कर्मचारी अशा एकूण ५० पोलीस अधिकारी/ कर्मचारी यांना दरवर्षी विशेष सेवा पदक व प्रशस्तीपत्र प्रदान करण्यास संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयाद्वारे मंजुरी देण्यात आली. उक्त ५० ही मर्यादा वाढविण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

<u>शासन निर्णय</u>-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या आस्थापनेवरील “जलद प्रतिसाद पथक” यामधील सलग दोन वर्ष सेवा *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* पूर्ण केलेले पोलीस अधिकारी आणि सलग चार वर्ष सेवा पूर्ण केलेले *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* पोलीस कर्मचारी यांना दरवर्षी विशेष सेवा पदक व प्रशस्तीपत्र प्रदान करण्याची, पुढील तक्यातील स्तंभ (३) मध्ये नमूद मर्यादा ही स्तंभ (४) मध्ये निर्दिष्ट केल्याप्रमाणे वाढविण्यास, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे:-

| जलद प्रतिसाद पथकातील पोलीस अधिकारी/ कर्मचारी (१) | आवश्यक सलग सेवा (२) | विद्यमान मर्यादा (३) | वाढीव मर्यादा (४) |
|---|---|---|---|
| पोलीस अधिकारी | दोन वर्ष *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* | ०८ | २५ |
| पोलीस कर्मचारी | चार वर्ष *(कमांडो प्रशिक्षण कालावधी धरुन)* | ४२ | १७५ |
| **एकूण-** | | **५०** | **२००** |

२. तसेच, उक्त विशेष सेवा पदके व प्रशस्तीपत्र दरवर्षी प्रदान करण्यासाठी रु.६००/- प्रति नग या दराने २०० पदके/ प्रशस्तीपत्र यांकरिता रु.१,२०,०००/- *(अक्षरी रुपये एक लक्ष वीस हजार फक्त)* प्रति वर्ष इतक्या खर्चास, याद्वारे, मंजुरी देण्यात येत आहे.

३. उक्त खर्च हा, गृह विभाग- मागणी क्र.बी.१, २०५५, पोलीस, ००, १०८, राज्य मुख्यालय पोलीस, (०२)(०१) शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (अनिवार्य) (२०५५ ००९७), १३- कार्यालयीन खर्च, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्तिय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग पहिला, उप विभाग तीन, अ.क्र.४, अन्वये प्रशासनिक विभाग या नात्याने गृह विभागास प्राप्त अधिकारांचा वापर करत सक्षम प्राधिकाऱ्याच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या *www.maharashtra.gov.in* या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०३२७१४५८५२४४२९ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VENKATESH BHAT

Digitally signed by VENKATESH BHAT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=5f0272b97156a5d2812bad6725ca46fb2671d1da08208cfdd6677fac0afd6bf2, pseudonym=4BD2A00BD54D7705C239CA2A5785A87EDE4514EC, serialNumber=6E277C9088A4CB8B53E535A4642A6800B908C5DBDB3A63175760874EBA717AE1, cn=VENKATESH BHAT
Date: 2023.03.27 15:05:38 +05'30'

**( व्यंकटेश भट )**
शासनाचे सह सचिव.

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राज भवन, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उप मुख्यमंत्री, गृह, यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई.

**प्रत-**

१) प्रधान महालेखापाल (लेखा व हकदारी/लेखा परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
२) पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४) निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५) निवड फाईल, पोल-१.